समाज कल्याण आयुक्तालयाच्या आस्थापनेवरील समाज कल्याण अधिकारी, गट-ब व गृहप्रमुख, गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः सकआ-२०२३/प्र.क्र.९२/आस्था-२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
तारीख: १४ जुलै, २०२३

**शासन आदेश -**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४)(दोन) व कलम ४(५) मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने समाज कल्याण अधिकारी, गट-ब व गृहप्रमुख, गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या विनंती/प्रशासकीय कारणास्तव खालीलप्रमाणे बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.:-

| समाज कल्याण अधिकारी, गट-ब | | |
|---|---|---|
| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व सध्याची पदस्थापना | बदलीने पदस्थापना |
| १ | श्री. आर. व्ही. जाधवर, समाज कल्याण अधिकारी, प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग, अमरावती | संशोधन अधिकारी, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, अमरावती |
| २. | श्रीमती सुलोचना सोनवणे, विशेष अधिकारी (शा.नि.शा.) सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, सोलापूर | संशोधन अधिकारी, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, उस्मानाबाद |
| ३. | श्री. अमित घवले, समाज कल्याण अधिकारी, सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण विभाग, परभणी | समाज कल्याण अधिकारी, प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग, लातूर |
| ४. | श्रीमती शितल सोनटक्के, सांख्यिकी अधिकारी (अजाऊयो) मुख्यालय, पुणे | एक वर्ष मुदतवाढ देण्यात येत आहे. |
| ५. | श्री. एस. एस. चिकणे, संशोधन अधिकारी, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, रत्नागिरी | एक वर्ष मुदतवाढ देण्यात येत आहे. |
| ६. | श्री. के. पी. कुलकर्णी, संशोधन अधिकारी, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, परभणी | संशोधन अधिकारी, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, छत्रपती संभाजीनगर |
| गृहप्रमुख गट-ब | | |
| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व सध्याची पदस्थापना | बदलीने पदस्थापना |
| १ | श्री. एस. एस. जैन, गृहप्रमुख, संत ज्ञानेश्वर मुलांचे शासकीय वसतिगृह (विश्रांतवाडी) पुणे | गृहप्रमुख, शासकीय मुलांचे वसतिगृह वरळी, मुंबई |

२. बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यास त्यांच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे आणि संबंधित अधिकाऱ्याने त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर होऊन त्याबाबतचा अहवाल आयुक्त, समाज कल्याण, पुणे व शासनास सादर करावा.

३. बदली झालेल्या अधिकाऱ्यांना कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येऊ नये, अन्यथा रजा मंजूर करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

४. बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर, अनुज्ञेय पदग्रहण अवधीत नवीन पदस्थापनेवर रुजू व्हावे, जे अधिकारी या कालमर्यादेचे पालन करणार नाहीत आणि पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न होता परस्पर गैरहजर राहतील, अशा अधिकाऱ्यांची अनुपस्थिती "अनधिकृत अनुपस्थिती" म्हणून समजण्यात येईल व पर्यायाने त्यांच्या सेवेत खंड होईल याची जाणीव सर्व संबंधितांना करुन देण्यात येत आहे.

५. जे अधिकारी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होणार नाहीत त्यांचेविरुध्द समाज कल्याण आयुक्तालयाने वेळीच प्रशासकीय कारवाई सुरु करावी व आवश्यकतेनुसार प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावा. या प्रकरणी वेळोवेळी शासनास अवगत करावे व अनुपालन अहवाल शासनास विहित कालमर्यादेत सादर करावा.

६. बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे अधिकारी शिस्तभंग विषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

७. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७१९१६२६०९०८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DINESH RAMCHANDRA DINGLE

Digitally signed by DINESH RAMCHANDRA DINGLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FC344849650CE07C3F9ADC7E2CD4976B2852065E2ACD65F7CEE1828C10091458, cn=DINESH RAMCHANDRA DINGLE
Date: 2023.07.19 16:26:53 +05'30'

**( दि. रा. डिंगळे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

सर्व संबधित अधिकारी (आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांचे व्दारा)

**प्रत,**

१) आयुक्त, समाज कल्याण, पुणे
२) आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे
३) महासंचालक, डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
४) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण

५) सर्व सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण
६) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र - १ , मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १ , मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर
८) सहाय्यक अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
९) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती, सोलापूर, उस्मानाबाद, परभणी, लातूर, अकोला, छत्रपती संभाजीनगर, पुणे
१०) सर्व उपसचिव/अवर सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
११) सचिव (सा.न्या.) यांचे स्विय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१२) निवडनस्ती-आस्था-२